निवडसूची सन २०१४-१५

"पोलीस उप महानिरीक्षक/अपर पोलीस आयुक्त, मोटार परिवहन (तांत्रिक) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन आदेश क्र: रापोसे-०९१२/प्र.क्र.३०२/पोल-१अ**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

दिनांक :-६ ऑक्टोंबर, २०१५.

**संदर्भ:**- १.उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग यांचे पत्र क्रमांक: ईसीबी-११५/प्र.क्र.१२१/१३, दि.१.७.२०१५.

२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र:पोमंस/१/ ७४३०/ पोउपमनि(तांत्रिक)-पदो/नि.सू.२०१२-१३/५४४/१२,दि. २९.८.२०१५.

**शासन आदेश :-**

"पोलीस उप महानिरीक्षक /अपर पोलीस आयुक्त, मोटार परिवहन (तांत्रिक)" या पदावर पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०१४-१५ च्या निवडसूचीमध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या अधिकाऱ्याची, खालील विवरणपत्रात त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या पदावर तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची नेमणूक | पदोन्नतीवरील पदस्थापना |
|---|---|---|
| १ | श्री.अतुल प्रल्हाद पाटील, पोलीस उप आयुक्त, मोटार परिवहन, मुंबई | अपर पोलीस आयुक्त, (तांत्रिक), मोटार परिवहन, बृहन्मुंबई |

२. श्री. अतुल प्रल्हाद पाटील यांची उपरोक्त पदावरील पदस्थापना त्यांच्या विरुध्दचे प्रलंबित न्यायालयीन प्रकरणातील अंतिम निर्णयाच्या तसेच त्यांनी शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, दि. २.४.१९७६ मधील तरतुदीनुसार सादर केलेल्या हमीपत्राच्या आणि पोलिस उप महानिरीक्षक/ अपर पोलिस आयुक्त, मोटार परिवहन (तांत्रिक) या पदाच्या अंतिम सेवाप्रवेश नियमांच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

३. सदर पदोन्नतीवरील नेमणूक, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल टी.ए.क्र.१/२०१४, टी.ए. क्र.२/२०१४ (रिट याचिका क्र:८४५२/२००४) संदर्भात मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दि. २८.११.२०१४ रोजी दिलेल्या निर्णयातील निर्देशांच्या तसेच, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

४. पदोन्नतीवर पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण अथवा अन्य मा. न्यायालयाचे स्थगिती आदेश असल्यास, ते विचारात घेऊन उक्त अधिकाऱ्यास पदोन्नतीवर पदस्थापना देण्यात यावी.

५. उक्त पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यास, सध्याच्या पदावरून कार्यमुक्त करून त्यांना पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्यासाठी, महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आवश्यक ती कार्यवाही त्वरित करावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०९०९१२३२३६२१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Charushila Chandrakant Tambekar

Digitally signed by Charushila Chandrakant Tambekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2b0496c0c213a3f50c6522cc39ae5de95e1150ac3287e89c21b1422e313820a2, cn=Charushila Chandrakant Tambekar
Date: 2015.10.06 17:59:19 +05'30'

**( चारुशीला तांबेकर )**

**सह सचिव, गृह विभाग**

**प्रति,**

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रतिलिपि,**

१) महालेखापाल -१, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) अपर पोलीस महासंचालक, मोटार परिवहन, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
१०) सामान्य प्रशासन विभाग (कार्या.१२/कार्या१३), मंत्रालय, मुंबई,
११) संबंधित अधिकारी (पोलीस महासंचालक यांचेमार्फत)
१२) निवडनस्ती (कार्या. पोल-१अ).